"एन. डी. स्टुडिओ" मौजे हातनोली ता. खालापूर जि. रायगड येथे आवश्यक सुधारणा करण्यास वित्तीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-२०२३/प्र.क्र.९४ (भाग-१)/सां.का.१**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २८ मार्च, २०२५.

**वाचा :**

१) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/ प्र.क्र.९४/सां.का.१, दि.०२ नोव्हेंबर, २०२३.

२) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. ०८ नोव्हेंबर, २०२३ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

३) मा. अपर मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. ०३ जानेवारी, २०२४ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

४) मा. मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. १५ मार्च, २०२४ रोजी संपन्न झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

५) राष्ट्रीय कंपनी विधी प्राधिकरण यांचे दि. १४ नोव्हेंबर, २०२४ रोजीचे आदेश.

६) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/ प्र.क्र.९४ (भाग-१)/ सां.का.१, दि.१० डिसेंबर, २०२४.

७) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/ प्र.क्र.९४ (भाग-१)/ सां.का.१, दि.२२ जानेवारी, २०२५.

८) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/ प्र.क्र.९४ (भाग-१)/ सां.का.१, दि.०५ मार्च, २०२५.

९) पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/ प्र.क्र.९४ (भाग-१)/ सां.का.१, दि.२४ मार्च, २०२५.

१०) महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित यांचे दि. ३०.०१.२०२५ रोजीचे पत्र.

११) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.संकीर्ण-२०२५/प्र.क्र.१५/ सां.का.१., दि.२७ मार्च, २०२५

**प्रस्तावना :**

उपनिर्दिष्ट क्र.१ अन्वये, दिवंगत श्री.नितीन देसाई यांचा कर्जत येथील एन.डी.स्टुडिओ शासनास हस्तांतरणासाठी मुल्यांकन करण्यासाठी समिती गठीत करण्यात आली होती.

त्यानुषंगाने, पुढील प्रशासकीय प्रक्रियेनंतर उपनिर्दिष्ट संदर्भ क्र. ५ अन्वये, राष्ट्रीय कंपनी विधी प्राधिकरण न्यायालयाच्या निकालानुसार सदर मालमत्ता शासनास हस्तांतर करण्यास्तव नॅशनल कंपनी लॉ ट्रिब्युनल, मुंबई (NCLT) यांना उपनिर्दिष्ट क्र.६ ते ८ अन्वये रुपये १२०.०० कोटी इतका निधी वितरित करण्यात आला आहे.

आता, एन. डी. स्टुडीओ, कर्जत हस्तांतरणानंतर करावयाच्या आवश्यक सोयी-सुविधांसाठी आवश्यक निधीस संदर्भ क्र. ९ अन्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. आता, रुपये २.३६ कोटी इतक्या निधीस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:**

मौजे हातनोली ता. खालापुर येथील “एन.डी. स्टुडिओ” येथे आवश्यक सोयी-सुविधा / सुधारणा करण्यासाठी रक्कम रुपये २,३६,००,०००/- ( रुपये दोन कोटी छत्तीस लक्ष फक्त ) इतक्या निधीची प्रतिपूर्ती महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई यांना करण्यास या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** यासाठी होणारा खर्च “मागणी क्र.झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती कार्यक्रम (००) १०२, कला संस्कृती प्रचालन (०३) (०७) मराठी चित्रपट निर्मितीसाठी सहायक अनुदान (२२०५ १५९९) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर)” या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात प्राप्त झालेल्या निधीमधून भागविण्यात यावा.

**०३.** सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१५५/२०२५/का-१४४३, दि.१४.०२.२०२५ आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१९५/२०२५/व्यय-१५, दि.१९.०३.२०२५ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. १२ फेब्रुवारी, २०२५ अन्वये विहित अटी व शर्ती पूर्ततेच्या अधिन मान्यता देण्यात येत आहे.

**०४.** या प्रयोजनार्थ वितरित निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र या विभागास सादर करणे बंधनकारक राहिल. यासाठी, उप सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून अवर सचिव (रोखशाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग तीन अ.क्र.४ नियम क्र.२७ (२) (अ) नुसार प्रशासकीय विभागास प्राप्त प्राधिकारानुसार काढण्यात येत आहे.

०६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०३२८१५०२३४२०२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2025.03.28 15:03:43 +05'30'

**(अनिरुध्द सू. देशपांडे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र चित्रपट, रंगभूमी आणि सांस्कृतिक विकास महामंडळ मर्यादित, दादासाहेब फाळके चित्रनगरी, गोरेगाव, मुंबई.
४. उपसचिव (सां.का.१) यांचे स्वीय सहायक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
९. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. अवर सचिव (रोख शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती (सां.का.१).